**महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत सार्वजनिक विभागाच्या नियंत्रणाखालील आरोग्य सेवा संचालनालयाच्या अधिनस्त संस्थांच्या माध्यमातून जमा होणाऱ्या निधीचा विनियोग करण्याबाबत**

## महाराष्ट्र शासन
### सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०१८/प्र.क्र.२५७/आरोग्य-६

गो.ते. रुग्णालय आवार संकुल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: ११ जानेवारी, २०१९

**वाचा:-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र. रागांयो-२०१०/प्र.क्र.२४०/आरोग्य-६, दि. ३१ मे, २०११
२) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्र. रागांयो-२०१६/प्र.क्र.६४/आरोग्य -६, दि. १३ एप्रिल, २०१७
३) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,शासन निर्णय क्र.वैशिवि-२०१७/प्र.क्र.२८२/प्रशा-२, दि.२१ सप्टेंबर,२०१८

**प्रस्तावना :-**

राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना पहिल्या टप्प्यात आठ जिल्हयांत (मुंबई शहर, मुंबई उपनगर, रायगड, धुळे, नांदेड, अमरावती, सोलापूर,गडचिरोली) दिनांक २ जुलै,२०१२ रोजीपासून लागू करण्यात आली तर दिनांक २१ नोव्हेंबर,२०१३ पासून संपुर्ण राज्यात ही योजना अंमलात आली आहे. ही योजना नॅशनल इन्श्युरन्स कंपनीच्या (NIC) सहभागाने राबविण्यात येत आहे. संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णय, दिनांक १३ एप्रिल,२०१७ अन्वये राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना दिनांक १ एप्रिल, २०१७ पासून महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना (MJPJAY) या नावाने सुरु ठेवण्यास मान्यता देण्यात आली आहे.

सदर योजनेतंर्गत विभागाच्या नियंत्रणाखालील संस्थांमध्ये रुग्णोपचार घेणाऱ्या सद्य:स्थितीतील रुग्णांच्या संख्येमध्ये वाढ करणे, विभागाच्या नियंत्रणाखालील संस्थामध्ये पायाभुत सुविधा व तज्ञ डॉक्टरांचा लाभ अधिकाधिक रुग्णांनी घ्यावा व त्या अनुषंगाने विभागातील संस्था सदर योजनेच्या कार्यपध्दतीनुसार मार्गदर्शक सुचनांनुसार विमा माध्यमातून प्राप्त होणाऱ्या रक्कमेचा संबंधित संस्थेच्या बळकटीकरणासाठी व काही महत्त्वाच्या आवर्ती खर्चासाठी व्हावा,सदर योजनेंतर्गत प्राप्त होणारा काही निधी प्रोत्साहन स्वरुपात अदा करुन त्यांचा उत्साह वाढविणे,सदर योजनेचे दावे तयार करण्यासाठी बाहयस्त्रोताद्वारे ई-निविदा कार्यपध्दतीने कंपनीची निवड करणे, सदर योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीपैकी काही निधी राज्य शासनास समर्पित करणे, इत्यादी बाबीसंदर्भात दिनांक ११ सप्टेंबर, २०१८ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयास अनुसरुन शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नियंत्रणाखालील महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत अंगीकृत जिल्हा/ सामान्य /स्त्री/ उपजिल्हा/क्षय/TB/ अस्थि रुग्ण/ ग्रामीण रुग्णालयांमध्ये व विभागीय संदर्भ सेवा रुग्णालये यांना महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेसंदर्भातील शासन निर्णयामधील तरतुदी व मार्गदर्शक सुचनानुसार सदर योजनेतंर्गत करण्यात येणाऱ्या रुग्णोपचाराच्या अनुषंगाने विमा माध्यमातुन निधी प्राप्त होतो. सदर निधीचा विनियोग खालीलप्रमाणे करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या कार्यपध्दतीनुसार विमा कंपनीकडून विभागाच्या नियंत्रणाखालील योजनेंतर्गत अंगीकृत संस्थांना संबंधित आर्थिक वर्षात प्राप्त होणाऱ्या विमा रक्कम/ निधीपैकी २५ टक्के निधी प्रतिवर्षी शासनास (वित्त विभागास) समर्पित करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२) सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नियंत्रणाखालील योजनेंतर्गत अंगीकृत जिल्हा/ सामान्य/उपजिल्हा/क्षय/ TB/ अस्थि रुग्ण/ग्रामीण रुग्णालयामध्ये व विभागीय संदर्भ सेवा रुग्णालयांमध्ये महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेतंर्गत पुरविण्यात येणाऱ्या रुग्णसेवेच्या प्रयोजनार्थ विभागाच्या नियंत्रणाखालील योजनेंतर्गत अंगीकृत संस्थांना प्राप्त होणाऱ्या विमा रक्कमेपैकी प्रत्येक प्रकरणतत्वे २० टक्के रक्कम प्रोत्साहनभत्ता म्हणून सदर रुग्णसेवा पुरविणाऱ्या योजनेंतर्गत अंगीकृत संस्थेतील खालील संवर्गातील अधिकारी आणि कर्मचारी यांना अदा करण्यात येईल.

| अ.क्र. | अधिकारी/ कर्मचारी पदनाम | मेडिकल प्रोसिजर्ससाठी अदा करावयाच्या प्रोत्साहनात्मक भत्ता | सर्जिकल प्रोसिजर्ससाठी अदा करावयाच्या प्रोत्साहनात्मक भत्ता |
|---|---|---|---|
| १ | उपचार करणारे मुख्य तज्ञ डॉक्टर (सर्जन, फिजीशियन व इतर) | ३० टक्के | ३० टक्के |
| २ | सहकारी तज्ञ डॉक्टर (सर्जन, फिजीशियन व इतर) | १५ टक्के | १५ टक्के |
| ३ | भुलतज्ञ | -- | १५ टक्के |
| ४ | उपचाराशी संबधित इतर कन्सल्टंट | १० टक्के | १० टक्के |
| ५ | शस्त्रक्रियागृह उपचाराशी संबधित वार्ड व इतर विभागातील स्टाफ नर्सेस, सिस्टर्स | १५ टक्के | १५ टक्के |
| ६ | शस्त्रक्रियागृह उपचाराशी संबधित वार्ड व इतर विभागातील स्टाफ नर्सेस, सिस्टर्स गट " ड" कर्मचारी | ५ टक्के | ५ टक्के |
| ७ | उपचाराशी संबधित तांत्रिक कर्मचारी | ४ टक्के | ४ टक्के |
| ८ | रेकॉर्ड किपींग सिस्टीम मॅनेजमेन्ट | १ टक्के | १ टक्के |
| ९ | वैद्यकीय समन्वयक | ५ टक्के | ५ टक्के |
| १० | इतर | १५ टक्के | -- |
| | एकूण | १०० टक्के | १०० टक्के |

सदर योजनेंतर्गत रुग्णोपचार प्रक्रियेत समाविष्ट उपरोक्त अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या अनुषंगाने उपरोक्त प्रमाणात प्रस्तावित केलेली प्रोत्साहन भत्ता रक्कमेची प्रतिमाह मर्यादा डॉक्टर/ सर्जन इत्यादींच्या बाबतीत मुळ वेतन, महागाई भत्ता व त्यांना देण्यात येणाऱ्या व्यवसायरोध भत्त्याच्या (Non -Practicing Allowance) २० टक्के एवढी व इतर कर्मचाऱ्यांच्या बाबतीत सदर प्रोत्साहनात्मक भत्ता/ रक्कम मुळ वेतन व महागाई भत्ता रक्कमेच्या २० टक्के प्रतिमाह इतक्या मर्यादेत अदा करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**३)** प्रस्तूत विषयी रुग्णालयात या योजनेंतर्गत करण्यात येणाऱ्या उपचारांच्या अनुषंगाने संबंधित विमा कंपनीकडे दाखल करण्यात येणारे दावे परिपुर्ण व आवश्यक कागदपत्रांसहसादर करण्यासाठी स्पर्धात्मक निविदाद्वारे निवडण्यात येणाऱ्या बाहयस्त्रोत कंपनीस सदर योजनेतर्गत प्राप्त होणाऱ्या प्रकरण परत्वे प्रकरणी ०३ टक्के पर्यंत निधी अदा करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**४)** महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेतंर्गत रुग्णालये यांना संबंधित आर्थिक वर्षात प्राप्त होणाऱ्या विमा स्वरुपातील उपरोक्त बाबींच्या प्रयोजनार्थ खर्च करण्यात आलेल्या निधीनंतर शिल्लक राहणारा ५२ टक्के निधी संबंधित अंगीकृत रुग्णालयातील सोबत जोडलेल्या **“ परिशिष्ट अ ”** मध्ये नमुद केलेल्या बाबींवर संबंधित संस्थेच्या जिल्हा शल्य चिकित्सक/ वैद्यकीय अधिक्षक यांच्या अध्यक्षतेखलील स्थापित करण्यात येणाऱ्या समितीमार्फत व उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ यांच्या मान्यतेने विहीत कार्यपध्दतीनुसार व शासन वेळोवेळी निश्चित करेल, त्या आर्थिक मर्यादेत खर्च करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**५)** संबंधित संस्थेत संस्थेच्या दैंनदिन व महत्वाच्या कामांसाठी राखुन ठेवण्यात आलेल्या ५२ टक्के निधीतून कोणती कामे करणे आवश्यक आहे, यासंदर्भातील बाबी ठरविण्यासाठी खालीलप्रमाणे जिल्हा शल्य चिकित्सक/ वैद्यकीय अधिक्षक यांच्या अध्यक्षतेखालील प्रत्येक योजनेंतर्गत अंगीकृत संस्थेत खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात यावी.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **समितीमधील पद** |
|---|---|---|
| १ | संबंधित संस्थेचे जिल्हा शल्य चिकित्सक/ वैद्यकीय अधिक्षक | अध्यक्ष |
| २ | संबंधित संस्थेचे एक सर्जन/ कान-नाक-घसा तज्ञ/ स्त्रीरोग तज्ञ/ अस्थिरोग तज्ञ/ नेत्रशल्य चिकित्सक | सदस्य |
| ३ | संबंधित संस्थेतील एक फिजीशियन/ बालरोग तज्ञ | सदस्य |
| ४ | संबंधित संस्थेचे (रुग्णालय) मुख्य प्रशासकीय अधिकारी/ प्रशासकीय अधिकारी/ कार्यालयीन अधिक्षक | सदस्य सचिव |
| ५ | बांधकाम/ विद्युत विषयक कामांच्या अनुषंगाने संबंधित संस्थेतील सार्वजनिक बांधकाम विभागाचे उपविभागीय अभियंता वा त्याने नेमलेला कार्यकारी अभियंता | सदस्य |
| ६ | संबंधित रुग्णालयाचे अतिरिक्त जिल्हा शल्य चिकित्सक/ जेष्ठतम वैद्यकीय अधिकारी | सदस्य |

सदर समितीकडून या निधीतून संस्थेची करण्यात येणारी काम व त्याची प्राथमिकता / प्राधन्याता/ निकड इत्यादीबाबत बैठकीत चर्चा करुन ठरविण्यात यावीत. सदर बैठकीत संबंधित समिती या विषयी उपलब्ध निधीतून करण्यात आलेल्या कामांचा नियमितपणे आढावा घेईल. संबंधित विभागप्रमुख त्यांच्या विभागातंर्गत या निधीतून करण्यात येणाऱ्या / करण्यात आलेल्या कामांचा प्रगती अहवाल माहिती बैठकीत सादर करेल. बैठकीचे सदस्य सचिव माहितीचे संकलन करतील. याविषयी करण्यात येणारा खर्च केवळ शासनाने मान्यता दिलेल्या बाबींवर विहीत कार्यपध्दतीनुसार, शासनाने वेळोवेळी विहीत / प्रदान केलेल्या आर्थिक मर्यादेतच करण्यात येईल या तत्त्वाचे सदर समिती कटाक्षाने पालन करील. सदर समितीची प्रत्येक महिन्यात किमान एक बैठक आयोजित करण्यात येईल.

सदर निधीतुन संबंधित संस्थेमध्ये करण्यात येणाऱ्या कामांचा महिनानिहाय झालेल्या खर्चाची माहिती संबंधित संस्था आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांना सादर करेल. आरोग्य सेवा संचालनालय सदर माहितीचे उचित कार्यवाहीस्तव संकलन करेल व झालेल्या खर्चाचा तिमाही आढावा घेईल.

६) सोबतचे **परिशिष्ट "अ"** मध्ये कालानुरुप व आवश्यकतेनुसार काही बाबी समाविष्ट वा वगळायच्या असतील तर अशी कार्यवाही शासन मान्यतेने करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

७) महात्मा ज्योतिबा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेतंर्गत व जमा अनुदानातून तज्ञ/ तज्ञांचे पॅनेल/ अधिकारी/ कर्मचारी यांची महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या अधिक प्रभावी अंमलबाजावणीसाठी आवश्यकता असल्यास, जिल्हास्तरीय समितीने त्याची आवश्यकता तपासून तसा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा यांच्याकडे मान्यतेस उपसंचालक आरोग्य सेवा, परिमंडळ यांच्यामार्फत सादर करावा. पुर्व मान्यतेनंतर सदर पदाची भरती विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ यांच्या अध्यक्षतेखालील समितीद्वारे ११ महिन्यांसाठी भरती करावी. पुर्वनियुक्ती देताना किमान चार दिवसांचा खंड देऊन नवीन जाहिरातीद्वारे उपसंचालक आरोग्य सेवा परिमंडळ यांच्या अध्यक्षतेखालील समितीद्वारे निवड करुन पदे भरण्यात यावीत. (यासाठी पुन्हा आरोग्य सेवा संचालनालस्तरावर प्रस्ताव सादर करण्याची आवश्यकता नाही.)

**समिती खालीलप्रमाणे स्थापन करण्यात येत आहे.**

| **अ.क्र.** | **सदस्यांची नावे** | **पदनाम** |
|---|---|---|
| १ | उपसंचालक आरोग्य सेवा, परिमंडळ | अध्यक्ष |
| २ | जिल्हा शल्य चिकित्सक/ वैद्यकीय अधिक्षक | सदस्य सचिव |
| ३ | मुख्य प्रशासकीय अधिकारी/ प्रशासकीय अधिकारी | सदस्य |
| ४ | निवासी वैद्यकीय अधिकारी | सदस्य |

२. या विभागांतर्गत पुर्वीच्या राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना व सध्या कार्यान्वित महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या कार्यपध्दतीच्या अनुषंगाने विमा दाव्यापोटी प्राप्त रक्कमेपैकी शिल्लक असलेल्या रक्कमेतून २५ टक्के रक्कम शासनास (वित्त विभागास) समर्पित करण्यास व उर्वरित ७५ टक्के

रक्कम सदर प्रस्तावासह जोडलेल्या **"परिशिष्ट अ"** मध्ये नमुद बाबींवर खर्च करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सार्वजनिक विभागाच्या नियंत्रणाखालील महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेंतर्गत ज्या अंगीकृत संस्थांच्या माध्यमातून निधी जमा होतो,त्याच संस्थेसाठी सदर निधीचा विनियोग करण्यात यावा.

३. सदर योजनेतंर्गत प्रोत्साहन भत्ता अदा करण्याची कार्यवाही प्रथम तीन वर्षासाठी प्रायोगिक तत्वावार सुरु करण्यात येईल. या बाबत तीन वर्ष पुर्ण होण्याच्या कालावधीपुर्वी सदर बाबींची एकंदरीत फलनिष्पतीचा आढावा घेऊन सदर प्रोत्साहन भत्ता अदा करण्याबाबतची कार्यपध्दती सुरु ठेवावी किंवा कसे, याबाबत आढावा घेऊन शासन मान्यतेने पुनर्निर्णय घेण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११०१७३५०६७५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Nivruti Gadge

Digitally signed by Subhash Nivruti Gadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b1f74930407346db2703eca69fb25a73a3ba8647d94e4c83579e877eeaa6372e, serialNumber=8aa1f531272224e355732cc20c64b2a014c4d982a276b8f3e7048995acbf1651, cn=Subhash Nivruti Gadge
Date: 2019.01.11 17:09:21 +05'30'

**(सु. नि. गाडगे)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री, आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-०१
१२) प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई-०१
१३) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई

१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) ½ महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपुर.
१६) आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान
१७) विभागीय आयुक्त (सर्व)
१८) अतिरीक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
१९) आयुक्त, महानगरपालीका (सर्व)
२०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२१) जिल्हाधिकारी (सर्व)
२२) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
२३) संचालक, वैद्यकिय शिक्षण विभाग, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई -०१
२४) संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
२५) जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)
२६) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
२७) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२८) निवासी लेख अधिकारी, मुंबई
२९) सहसंचालक/ उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
३०) वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय नाशिक व अमरावती
३१) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकिय महाविद्यालये व रुग्णालये (सर्व)
३२) अधिष्ठाता, वैद्यकिय महाविद्यालय व रुग्णालय (सर्व संबंधित रुग्णालये)
३३) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१३ / अर्थ-९), मंत्रालय, मुंबई
३४) कार्यासन अधिकारी (प्रशा-२),वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,मंत्रालय,मुंबई
३५) सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३६) निवड नस्ती (आरोग्य-६)

## परिशिष्ट-अ

| अ.क्र. | बाबी |
|---|---|
| १ | रुग्णालय बाहय भुलतज्ञांच्या वा अन्य विषयातील तज्ञ यांच्या सेवा संबंधित रुग्णोपचारासंबंधित बाबींसाठी घेतल्यास शासन वेळोवेळी निश्चित करेल, त्या मर्यादेत अदा करावयाची फी |
| २ | रुग्णालयीन सुधारणांबाबत येणाऱ्या अडचणींबाबत मात करण्यासाठी लागणारा तातडीचा खर्च तसेच रुग्णांच्या कल्याणकारी योजनेवर येणारा खर्च (प्रदान केलेल्या आर्थिक मर्यादेच्या अधिन राहुन) |
| ३ | अपवादात्मक परिस्थितीत रुग्णांना तातडीने लागणारी जीवरक्षक औषधे व उपकरणे तसेच अत्यावश्यक औषधे व साहित्यसामुग्री |
| ४ | रुक्तपेढी अदयावत ठेवण्याच्या दृष्टीने येणारा खर्च |
| ५ | रुग्णवाहिकेच्या इंधनासाठी येणारा तातडीचा खर्च (नियमित अनुदान उपलब्ध नसल्यास) |
| ६ | संबंधित महानगरपालिका/महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ/ मुंबई विद्युत पुरवठा व परिवहन मंडळाची दंडात्मक कारवाई टाळण्याच्या दृष्टीने येणारा किमान तातडीचा खर्च, तसेच रुग्ण उपचारास्तव पुरेसा व सुरळीत विद्युत पुरवठा व्हावा यास्तव करावयाच्या उपाययोजनांवरील करावयाचा खर्च (सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेनंतर) |
| ७ | देहदान करण्यात येणाऱ्या व्यक्तींच्या शववाहिनींवरील खर्च |
| ८ | रुग्णालयाच्या इमारतीची तातडीची किरकोळ दुरस्ती, यात काचेचेच तावदान बदलणे, पाण्याची गळती थांबविण्यासाठी प्लॅस्टर करणे, नळांना वॉशर टाकणे, इत्यादीसारख्या छोटया दुरुस्त्यांचा समावेश राहील. (प्रदान केलेल्या आर्थिक मर्यादेच्या अधिन राहून) |
| ९ | प्रशिक्षणार्थी अधिकारी/ कर्मचारी हिताच्या दृष्टीकोनातून रुग्णालयीन प्रशिक्षण केंद्र (Hospital Training Centre) प्रयोगशाळा अदयावत ठेवण्यासाठी लागणारी उपकरणे, शैक्षणिक प्रयोजनार्थ लागणारी उपकरणे तसेच ग्रंथालयातील शैक्षणिकदृष्टया महत्वाची पुस्तके सुस्थितीत ठेवण्यासाठी येणारा आवर्ती/ अनावर्ती (सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेनंतर) |
| १० | संबंधित उद्दिष्टाखाली पुरेसा निधी उपलब्ध नसल्यास, अत्यंत तातडीच्या परिस्थितीत संस्थेसाठी आवश्यक असणारी यंत्रसामुग्री विहीत कार्यपध्दतीनुसार व शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या आर्थिक मर्यादेत खरेदी करणे. |
| ११ | (२१) सामुग्री व पुरवठा या उद्दिष्टाखाली पुरेसे अनुदान उपलब्ध नसल्यास, अत्यंत तातडीच्या परिस्थितीत व रुग्णहिताच्या विचारात घेता या उद्दिष्टाखालील बाबी विहीत कार्यपध्दतीनुसार व शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या आर्थिक मर्यादेत खरेदी करणे. |
| १२ | (७२) यंत्रसामुग्री व साधनसामुग्री दुरुस्ती व परिरक्षण उद्दिष्टाखालील पुरेसा निधी उपलब्ध न झाल्यास या विषयीचा खर्च (विहीत कार्यपध्दतीनुसार) |
| १३ | अनुदाना अभावी प्रलंबित असलेली जीवरक्षक प्राणवायु पुरवठयांची देयके |
| १४ | संबंधित उद्दिष्टाखाली निधी उपलब्ध नसल्यास, कंत्राटी सेवेची देयके (प्रदान केलेल्या आर्थिक मर्यादेच्या अधिन राहून) |
| १५ | संबंधित उद्दिष्टाखाली निधी नसल्यास, रुग्णोपचारासाठी आवश्यक वाहने व रुग्णवाहिका दुरुस्ती (प्रदान केलेल्या आर्थिक मर्यादेच्या अधिन राहून) |

| | |
|---|---|
| १६ | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री निर्लेखन निरिक्षणासाठी येणारा खर्च |
| १७ | संस्थेच्या जागेची मोजणीसाठी अदा करावयाचे शासकीय शुल्क |
| १८ | संबंधित उद्दिष्टाखाली निधी उपलब्ध नसल्यास, कंत्राटी आहार कंत्राटी स्वच्छता, कंत्राटी सुरक्षा रक्षक देयके (प्रदान केलेल्या आर्थिक मर्यादेच्या अधिन राहून व सक्षम प्राधिकाऱ्याने मान्य केलेल्या सेवांबाबत) |
| १९ | रसायने व किट्स यांची प्रलंबित देयके |
| २० | योजनेच्या अंमलबाजवणीसाठी आवश्यक असलेल्या डाटा एंन्ट्री ऑपरेटर, विशेषज्ञ सेवा, नर्सेस इत्यादी तसेच इतर आवश्यक कंत्राटी पध्दतीने नियुक्त केलेल्या अवैद्यकीय सेवेची देयके (विभागीय संदर्भ रुग्णालय नाशिक व अमरावती साठी) (नियुक्त सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने झाली पाहिजे) |
| २१ | संबंधित लेखाशिर्षाखाली निधी उपलब्ध नसल्यास, जैविक निकृष्ट दर्जाची (बायोडिग्रीडेबल)/ जैविक औषधी कचऱ्याच्या पिशव्या (बायोमेडिकल वेस्ट बॅगांची) प्रलंबित देयके. (आर्थिक मर्यादेच्या अधिन राहून) |
| २२ | बायोमेडिकल वेस्टची प्रलंबित देयके (आर्थिक मर्यादेच्या अधिन राहून) |
| २३ | खाजगी रुग्णालयांकडून कंत्राटी पध्दतीने घेतलेल्या चाचण्यांवरील प्रलंबित देयके अदा करणे (सी. टी. स्कॅन, एक्स-रे, सोनोग्राफी पॅथॉलॉजी इ.) (सामंजस्य करार MOU सक्षम प्राधिकाऱ्यांकडून / उपसंचालकाकडून मंजुर करुन घेणे आवश्यक. |
| २४ | ह्रदयरोग, कर्करोग, प्लॅस्टीक सर्जरी, अर्भक शस्त्रक्रिया, मानवी अवयव प्रत्योरापण, किडनी, डायलेसिस, न्युरोलॉजी, न्युरो सर्जरी इ. अतिविशिष्ट शस्त्रक्रिया करण्याकरिता आवश्यक औषधे व साधनसामुग्री खरेदी (तांत्रिक मान्यता उपसंचालक स्तरावर घेणे) |
| २५ | कर्करोग विभागातील किरणोउपचार तज्ञ, मुख्य भौतिकशास्त्र (Physicist) वेत्ता, जीव वैद्यकीय अभियंता, मोल्डरुम तंत्रज्ञ यांचे मानधन (वेळोवळी निश्चित केलेल्या मर्यादेच्या अधिन राहून) |
| २६ | योजना प्रभावीपणे राबविण्याकरिता योजनेंतर्गत रुग्णालयास आवश्यकतेनुसार कंत्राटी अधिकारी/ कर्मचारी यांची नेमणूक करावयाची झाल्यास त्यास, संचालक, आरोग्य सेवा यांच्या पुर्व परवानगीने मंजुर करुन घ्यावीत व तद्नंतर पुनर्नियुक्ती /भरती प्रक्रिया उपसंचालक स्तरावरील समितीने करावी. |
| २७ | ५२ टक्के मधील ५ टक्के निधी संशोधन कार्यावर खर्च येवू शकेल यासाठी प्राप्त प्रस्ताव सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये) यांना सादर करावेत व आयुक्त, आरोग्य सेवा यांच्या मान्यतेने संशोधन प्रकल्प राबविण्यात यावेत. |

******